जिल्हा परिषद शिक्षकांच्या जिल्हांतर्गत बदली धोरणातील विशेष संवर्ग शिक्षक भाग-१ बाबत स्पष्टीकरण...

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

**शासन परिपत्रक क्रमांकः जिपब-२०२३/प्र.क्र.११८/आस्था-१४**

२५, मर्झबान पथ, बांधकाम भवन,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
दिनांक:- १६ जून, २०२५

<u>वाचा :-</u>

शासन निर्णय क्र.जिपब-२०२३/११८/आस्था-१४, दि.१८.६.२०२४.

## शासन परिपत्रक

जिल्हा परिषद शिक्षकांच्या जिल्हांतर्गत बदलीसाठीचे सुधारित धोरण वाचा येथील दि.१८.६.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आले आहे. सदर शासन निर्णयातील **व्याख्या १.८ मध्ये विशेष संवर्ग शिक्षक भाग-१** म्हणजे विविध आजारांनी ग्रस्त शिक्षक, दिव्यांग शिक्षक, दिव्यांग मुलांचे पालक परित्यक्ता/घटस्फोटीत महिला शिक्षक, ५३ वर्षे पूर्ण झालेले शिक्षक, विधवा, कुमारिका शिक्षक, तसेच ज्या शिक्षकांचे जोडीदार शासन निर्णयामध्ये नमुद गंभीर आजाराने ग्रस्त आहेत इत्यादी अशा शिक्षकांचा समावेश करण्यात आला आहे.

२. तथापि, विशेष संवर्ग-१ मधून विविध आजारांची व दिव्यांगत्वाची खोटी प्रमाणपत्रे सादर करुन बदलीमधून सूट मिळविणाऱ्या शिक्षकांचे प्रमाण जास्त असल्याच्या तक्रारी प्राप्त झाल्या आहेत. तसेच काही न्यायालयीन प्रकरणांमध्ये जिल्हांतर्गत बदलीमध्ये विविध संवर्ग निर्माण करुन अशा शिक्षकांना बदलीपासून का वगळण्यात आले आहे, याबाबत खुलासा सादर करण्याबाबत शासनास आदेशित केले आहे.

३. त्यामुळे शासन निर्णय दि.१८.६.२०२४ मधील विशेष संवर्ग शिक्षक भाग-१ च्या अनुषंगाने खालील सविस्तर सूचना सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या निदर्शनास आणण्यात येत आहेत,-

I) विशेष संवर्ग-१ मध्ये गणले जाण्यासाठी संबंधित शिक्षकाने सादर केलेले दिव्यांगत्वाबाबतचे ऑनलाईन युडी-आयडी प्रमाणपत्राबाबत नेमण्यात आलेल्या त्रिसदस्यीय समितीस सदर शिक्षकाच्या दिव्यांगत्वाबाबत काही साशंकता आढळून आल्यास, संबंधित शिक्षकाची जिल्हा शल्य चिकीत्सकांकडून तपासणी करुन घेण्यात यावी.

II) तसेच दिव्यांगत्वाबाबतचे देण्यात आलेले उपरोक्त प्रमाणपत्र हे दिव्यांगत्वाचे लाभ अनुज्ञेय करण्याकरीता दिव्यांग कल्याण विभाग व सार्वजनिक आरोग्य विभागाने वेळोवेळी दिलेल्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे दिलेले असले पाहिजे.

III) तसेच विविध आजारांबाबत सादर करण्यात आलेल्या वैद्यकीय प्रमाणपत्रामध्ये अनियमितता आढळून आल्यास, अशा शिक्षकांची देखील जिल्हा शल्य चिकीत्सकांमार्फत फेरतपासणी करण्यात यावी.

IV) विशेष संवर्ग- १ मधून बदलीसाठी अर्ज सादर करणाऱ्या घटस्फोटीत/परित्यक्ता महिला शिक्षकांबाबत काही अनियमितता आढळून आल्यास संबंधित घटस्फोटीत शिक्षिकेच्या मा.न्यायालयाने मंजूर केलेल्या घटस्फोटाच्या प्रमाणपत्राची प्रमाणित प्रत, परित्यक्ता शिक्षिकेने ती पतीबरोबर राहत नसल्याबाबत सादर केलेले स्वयंघोषणापत्र, त्यांच्या रहिवासाचे दाखले, आधार कार्ड, शिधापत्रिका इत्यादीवरुन पडताळणी करावी. तसेच आवश्यकतेनुसार अशा महिला शिक्षिकांच्या निवासी पत्त्यावर प्रत्यक्ष जाऊन शहानिशा करावी.

V) दिव्यांग व वैद्यकीय प्रमाणपत्रांमध्ये व घटस्फोटाच्या आदेशामध्ये तसेच परितक्त्या असल्याबाबतच्या स्वयंघोषणापत्रामध्ये काही अनियमितता केल्याचे आढळून आल्यास, अशा शिक्षकांवर फौजदारी गुन्हे दाखल करण्यात यावेत. तसेच संबंधित शिक्षकाचे निलंबन करुन शिस्तभंगविषयक कार्यवाही करण्यात यावी.

VI) अशा शिक्षकांविरुध्द कारवाई न झाल्याचे आढळून आल्यास, संबंधित जबाबदार अधिकाऱ्यांवर जबाबदारी निश्चित करण्यात येईल.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६१६१२२६००७६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

JYOTSNA SUNIL ARJUN

Digitally signed by JYOTSNA SUNIL ARJUN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=A77738EA5AB09ABD99367B03338CE9C16517E87D42E99469F031C79FF053AEEA, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=984B9ADBA8339F7D6208C334DDD686A8F076E25FFF19427CAAC5BD0E7F88E592, cn=JYOTSNA SUNIL ARJUN
Date: 2025.06.16 12:27:15 +05'30'

**( ज्योत्स्ना अर्जुन )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल महोदय यांचे सचिव, मलबार हिल, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
३) मा.उप मुख्यमंत्री (वित्त/नगर विकास) यांचे प्रधान सचिव
४) मा.मंत्री/मा.राज्यमंत्री (ग्रामविकास) महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव
५) मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

६) सर्व सन्माननीय विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय

७) मा.मुख्य सचिव यांचे उपसचिव,मंत्रालय, मुंबई

८) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग

९) सर्व विभागीय आयुक्त,

१०) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद

११) उपायुक्त (आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालये (सर्व विभाग)

१२) माहिती व जनसंपर्क संचालनालय यांना प्रसिध्दीसाठी अग्रेषित.

१३) सर्व कार्यासने, ग्रामविकास विभाग.

१४) निवड नस्ती कार्या क्र.आस्था-१४, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.